2011053112151001

RNI. No. MAHBIL/2009/35530



# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक १२] गुरुवार, मे २६, २०११/ज्येष्ठ ५, शके १९३३ [पृष्ठे ३, किंमत रुपये २०.००

**असाधारण क्रमांक ४४**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

## अनुक्रमणिका



## नगर विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २६ मे २०११.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XIII OF 2011.**

AN ORDINANCE

FURTHER TO AMEND THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949, THE CITY OF NAGPUR CORPORATION ACT, 1948 AND THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, NAGAR PANCHAYATS AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

**सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १३.**

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ; १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०.

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ. **१.** (१) या अध्यादेशास, मुंबई प्रांतिक महानगरपालिका, नागपूर शहर महानगरपालिका आणि महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी (सुधारणा) अध्यादेश, २०११ असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५ ची सुधारणा. **२.** मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याच्या कलम ५ मधील, पोट-कलम (३) मध्ये, " केवळ एकच पालिका-सदस्य निवडून देण्यात येईल " या मजकुराऐवजी " शक्य असेल तेथवर दोन पालिका-सदस्य परंतु दोन पेक्षा कमी नाहीत व तीन पेक्षा अधिक होणार नाहीत एवढे पालिका-सदस्य निवडून देण्यात येतील, आणि या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, प्रत्येक मतदाराला, त्याच्या प्रभागातील निवडून द्यावयाच्या पालिका-सदस्यांच्या संख्येइतकी मते देण्याचा हक्क असेल " हा मजकूर दाखल करण्यात येईल. १९४९ चा मुंबई ५९.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ९ ची सुधारणा. **३.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याच्या कलम ९ मधील, पोट-कलम (२) मध्ये, " केवळ एकच पालिका-सदस्य निवडून देण्यात येईल " या मजकुराऐवजी " शक्य असेल तेथवर दोन पालिका-सदस्य परंतु दोन पेक्षा कमी नाहीत व तीन पेक्षा अधिक होणार नाहीत एवढे पालिका-सदस्य निवडून देण्यात येतील, आणि या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, प्रत्येक मतदाराला, त्याच्या प्रभागातील निवडून द्यावयाच्या पालिका-सदस्यांच्या संख्येइतकी मते देण्याचा हक्क असेल " हा मजकूर दाखल करण्यात येईल. १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १० ची सुधारणा. **४.** महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ याच्या कलम १० मधील, पोट-कलम (२) ऐवजी पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल:— १९६५ चा महा. ४०.

" (२) प्रत्येक प्रभागातून शक्य असेल तेथवर चार पालिका-सदस्य परंतु तीन पेक्षा कमी नाहीत व पाच पेक्षा अधिक होणार नाहीत एवढे पालिका-सदस्य निवडून देण्यात येतील, आणि कलम १४ च्या पोट-कलम (२) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, प्रत्येक मतदाराला, त्याच्या प्रभागातील निवडून द्यावयाच्या पालिका-सदस्यांच्या संख्येइतकी मते देण्याचा हक्क असेल.".

## निवेदन.

नागरी स्थानिक संस्थांच्या विद्यमान पद्धतीनुसार, महानगरपालिकांच्या किंवा नगरपरिषदांच्या प्रत्येक प्रभागामध्ये एक पालिका-सदस्य निवडण्यात येतो. महाराष्ट्र शासनाने, २१ एप्रिल २०११ रोजी प्रसिद्ध केलेल्या सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २० अन्वये नगरपालिका कायद्यांमध्ये सुधारणा करून, नागरी स्थानिक संस्थांमधील महिलांचे आरक्षण एक-तृतीयांश ऐवजी एक द्वितीयांश इतके केले आहे. नागरी स्थानिक संस्थांमध्ये महिलांना एक-द्वितीयांश आरक्षण देण्याचे धोरण योग्य रीतीने राबविण्यासाठी, नगरपालिका कायद्यांमध्ये यथोचित सुधारणा करून बहुसदस्यीय प्रभाग पद्धती पुन:स्थापित करणे आवश्यक आहे असे महाराष्ट्र शासनास वाटते.

२. महानगरपालिकांच्या, बृहन्मुंबई महानगरपालिका वगळता, प्रत्येक प्रभागामधून शक्य असेल तेथवर दोन पालिका-सदस्य परंतु दोन पेक्षा कमी नाहीत व तीन पेक्षा अधिक होणार नाहीत एवढे पालिका-सदस्य निवडण्याचे, आणि नगरपरिषदांच्या प्रत्येक प्रभागामधून शक्य असेल तेथवर चार पालिका-सदस्य परंतु तीन पेक्षा कमी नाहीत व पाच पेक्षा अधिक होणार नाहीत एवढे पालिका-सदस्य निवडण्याचे, ठरविण्यात आले आहे.

३. बहुतेक नागरी स्थानिक संस्थांमधील निवडणुका २०११-२०१२ या वर्षात घेण्यात येणार आहेत. नागरी स्थानिक संस्थांच्या आगामी निवडणुकांमध्ये बहुसदस्यीय प्रभाग पद्धती राबविण्याचे प्रस्तावित असल्यामुळे, या प्रयोजनासाठी नगरपालिका कायद्यांमध्ये तात्काळ तरतुदी करणे इष्ट आहे.

४. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांकरिता मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई ५९), नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (१९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २) आणि महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे; म्हणून, हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक २६ मे २०११.

**के. शंकरनारायणन्,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मनु कुमार श्रीवास्तव,**
शासनाचे प्रधान सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

RNI No. MAHENG/2009/35528



# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक १८ गुरुवार, मे २६, २०११/ज्येष्ठ ५, शके १९३३ [ पृष्ठे ३, किंमत : रुपये १४.००

असाधारण क्रमांक ६३

**प्राधिकृत प्रकाशन**

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Bombay Provincial Municipal Corporations, the City of Nagpur Corporation and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Amendment) Ordinance, 2011. (Mah. Ord. XIII of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

[Translation in English of the Bombay Provincial Municipal Corporations, the City of Nagpur Corporation and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Amendment) Ordinance, 2011. (Mah. Ord. XIII of 2011), published under the authority of the Governor].

---

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 26th May 2011.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XIII OF 2011.**

*AN ORDINANCE*

*further to amend the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965.*

**WHEREAS** both Houses of the State Legislature are not in session ;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes hereinafter appearing ; Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause *(1)* of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

Short title and commencement. 1. *(1)* This Ordinance may be called the Bombay Provincial Municipal Corporations, the City of Nagpur Corporation and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Amendment) Ordinance, 2011.

*(2)* It shall come into force at once.

Amendment of section 5 of Bom. LIX of 1949. 2. In section 5 of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, in sub-section *(3)*, for the words "elect only one Councillor" the words "elect as far as possible two Councillors but not less than two and not more than three Councillors, and each voter shall, notwithstanding anything contained in this Act, be entitled to cast the same number of votes, as the number of Councillors to be elected in his ward " shall be substituted. Bom. LIX of 1949.

Amendment of section 9 of C.P. and Berar II of 1950. 3. In section 9 of the City of Nagpur Corporation Act, 1948, in sub-section *(2)*, for the words "elect only one Councillor" the words "elect as far as possible two Councillors but not less than two and not more than three Councillors, and each voter shall, notwithstanding anything contained in this Act, be entitled to cast the same number of votes, as the number of Councillors to be elected in his ward" shall be substituted. C.P. and Berar II of 1950.

Amendment of section 10 of Mah. XL of 1965. 4. In section 10 of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for sub-section *(2)*, the following sub-section shall be substituted, namely :— Mah. XL of 1965.

"*(2)* Each of the wards shall elect as far as possible four Councillors but not less than three and not more than five Councillors, and each voter shall, notwithstanding anything contained in sub-section *(2)* of section 14, be entitled to cast the same number of votes, as the number of Councillors to be elected in his ward.".

## STATEMENT

In the present system of the Urban Local Bodies, one Councillor is being elected in each ward of the Municipal Corporations or Councils. The Government of Maharashtra has enhanced the reservation for the Women in the Urban Local Bodies from one-third to one-half by amending the Municipal Laws under Maharashtra Act No. XX of 2011 published on the 21st April 2011. In order to implement the policy of one-half reservation for women in the Urban Local Bodies in proper manner, the Government of Maharashtra considers it necessary to introduce multi-member ward system by amending the Municipal Laws, suitably.

2. It is decided to elect as far as possible two Councillors but not less than two and not more than three Councillors from each ward of the Municipal Corporations except the Municipal Corporation of Greater Mumbai and as far as possible four Councillors but not less than three and not more than five Councillors from each ward of the Municipal Councils.

3. The elections of most of the Urban Local Bodies are due in the year 2011-2012. As the multi-member ward system is proposed to be implemented in the forthcoming elections of the Urban Local Bodies, it is expedient to make the provisions for this purpose in the Municipal Laws, forthwith.

4. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (Bom. LIX of 1949), the City of Nagpur Corporation Act, 1948 (C.P. and Berar II of 1950) and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965), for the purposes aforesaid, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 26th May 2011.

K. SANKARANARAYANAN,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

MANU KUMAR SRIVASTAVA,

Principal Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.